**डॉ. आकाश रामहरी किसवे, नायब तहसीलदार, ता.नांदुरा, जि. बुलढाणा यांची श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या कार्यालयामध्ये प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सासंवि -१०१८/६९४/प्र.क्र.७८/का.१६**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २५ जून, २०१८

__वाचा__:-१) विधि व न्याय विभाग,शासन निर्णय क्र.सासंवि २००९/४३३/(३७/०९)/का.सोळा दि.०७.०८.२००९
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएस/साप्रशा/आस्था/६९९४/२०१८,दि.२८.०३.२०१८

**__प्रस्तावना:-__**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे नियंत्रण श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम,२००४ अन्वये शासनाकडे आहे. श्री क्षेत्र शिर्डी येथे साईबाबांच्या दर्शनासाठी येणाऱ्या भक्तांत मोठ्या प्रमाणात वाढ झाली आहे.विभागाच्या संदर्भाधीन दि.०७.०८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्या आस्थापनेवरील पदाचा आकृतीबंध मंजुर करण्यात आला आहे. या आकृतीबंधात प्रशासकीय अधिकारी या संवर्गातील पाच पदे मंजुर आहेत. व्यवस्थापन समितीच्या दि.१८.०७.२०१२ च्या सभेतील निर्णय क्र.६३३ अन्वये यापैकी २ पदे प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी राखीव आहेत. प्रतिनियुक्तीने भरावयाची सदर दोन्ही पदे सध्या रिक्त आहेत. सन २०१७-२०१८ हे वर्ष संस्थानाद्वारे श्री साईबाबा महासमाधी शताब्दी वर्ष म्हणून साजरे करण्यात येत आहे. श्री साईबाबा महासमाधी कालावधीत विकास आराखडा तयार करण्यात आला असून त्याचे काम विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक आहे. डॉ. आकाश रामहरी किसवे, नायब तहसिलदार, ता.नांदुरा, जि. बुलढाणा यांची श्री साईबाबा संस्थानातील प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**__शासन निर्णय:-__**

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा व निलंबन बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील नियम ३९ व ४० आणि सदर नियमांच्या परिशिष्ट-दोन मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती यांच्या अधीन राहून डॉ. आकाश रामहरी किसवे, नायब

तहसिलदार, ता.नांदुरा, जि.बुलढाणा यांची श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या संस्थानातील "प्रशासकीय अधिकारी" या पदावर दि.२५.०६.२०१८ पासून प्रथमत: एक वर्षासाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यत प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२६१६३४२१६८१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.06.26 16:39:34 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
कार्यासन अधिकारी

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) अप्पर मुख्य सचिव(महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई (यांना विनंती करण्यात येते की, डॉ.आकाश रामहरी किसवे, नायब तहसिलदार, ता.नांदुरा, जि.बुलढाणा यांना श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी च्या आस्थापनेवरील प्रशासकीय अधिकारी या पदावर रुजू होण्यासाठी कार्यमुक्त करण्यासंदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.)

४) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.

५) अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, ता.राहता, जि. अहमदनगर

६) मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, ता.राहता, जि. अहमदनगर

७) डॉ.आकाश रामहरी किसवे, नायब तहसिलदार, ता.नांदुरा, जि.बुलढाणा

८) निवडनस्ती.